**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीएस २०२२/१२/ प्र.क्र.७५०/पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १९ जून, २०२३.

**प्रस्तावना :-**

पर्यटन हे सर्वात वेगाने वाढणारे क्षेत्र आहे. त्यामुळे महिलांचा पर्यटन क्षेत्रातील सहभाग त्यांच्या आर्थिक विकासाकरीता एक चांगले साधन ठरु शकते. पर्यटन क्षेत्रात महिलांमध्ये उद्योजकता आणि नेतृत्व गुण विकसित करण्याच्या अनेक संधी उपलब्ध आहेत. राज्यातील महिलांच्या सक्षमीकरणासाठी महिला केंद्रित / लिंग समावेशक पर्यटन धोरण जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. **महिलांसाठी पर्यटन धोरणाची पंचसूत्री :-** राज्यातील महिलांच्या सक्षमीकरणाच्या दृष्टीने महिला केंद्रित / लिंग समावेशक पर्यटन धोरण आखण्यात आले असून सदर धोरणाची पंचसुत्री खालीलप्रमाणे आहे :-

१. महिला उद्योजकता विकास.
२. महिलांकरीता पायाभुत सुविधा.
३. महिला पर्यटकांच्या सुरक्षिततेला प्राधान्य देणे.
४. महिला पर्यटकांसाठी कस्टमाईज्ड उत्पादने/सवलती.
५. प्रवास आणि पर्यटन विकास.

२. **कार्यदलाचे (Task Force) गठन :- या धोरणाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी कृती आराखडा तयार करणे, उपाययोजना सुचविणे व संनियंत्रण करण्यासाठी एक कार्यदल (Task Force) गठीत करण्यात येत असून कार्यदलाची रचना खालीलप्रमाणे राहील :-**

| | | |
|---|---|---|
| १. | मा.मंत्री (पर्यटन) | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव ( नियोजन ) | सदस्य |
| ३. | प्रधान सचिव / सचिव ( व्यय ), वित्त विभाग. | सदस्य |
| ४. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव ( पर्यटन ) | सदस्य |
| ५. | प्रधान सचिव / सचिव, महिला व बाल विकास | सदस्य |
| ६. | प्रधान सचिव / सचिव, कौशल्य व रोजगार विकास | सदस्य |
| ७. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ | सदस्य |
| ८. | संचालक, पर्यटन संचालनालय | सदस्य सचिव |

३. **अंमलबजावणी यंत्रणा :- या पंचसूत्रीनुसार हे धोरण पर्यटन संचालनालय व** महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांच्यामार्फत सर्व संबंधित विभागांच्या सहकार्याने राबविण्यात येईल. **हे धोरण राज्याच्या पर्यटन धोरणाचा अविभाज्य भाग असेल आणि वार्षिक कृती आराखड्याच्या आधारे त्याची अंमलबजावणी केली जाईल.**

४. **पर्यटन विभागामार्फत देण्यात येणारी प्रोत्साहने व सवलती :-**

**अ) पर्यटन संचालनालयामार्फत प्रोत्साहने व सवलती :-**

१. पर्यटन क्षेत्रातील महिला उद्योजकांचा सहभाग वाढविण्यासाठी राज्यातील प्रत्येक तालुक्यामधील पर्यटन संचालनालयाकडे नोंदणीकृत महिलांच्या मालकीच्या व त्यांनी

चालविलेल्या १० पर्यटन व्यवसायांना (होमस्टे, हॉटेल / रेस्टॉरंट, टूर अॅन्ड ट्रॅव्हल एजन्सी इ.) पर्यटन व्यवसाय उभारणीसाठी मान्यताप्राप्त बँकांमार्फत घेतलेल्या रु.१५ लाख पर्यंतच्या कर्जाच्या रक्कमेवरील व्याजाची रक्कम १२% च्या मर्यादेत, त्यांच्या आधार लिंक बँक खात्यात, पूर्ण कर्ज परतफेड होईपर्यंत किंवा ०७ वर्षे कालावधीपर्यंत किंवा व्याजाची रक्कम रु.४.५ लक्षच्या मर्यादेपर्यंत, या तीन पर्यायांपैकी जे आधी घडेल तोपर्यंत, दरमहा खालील अटींच्या अधीन राहून जमा करण्यात येईल :-

अ) पर्यटन व्यवसाय पर्यटन संचालनालयाकडे नोंदणीकृत असला पाहिजे.

ब) पर्यटन व्यवसाय महिलांच्या मालकीच्या व त्यांनी चालविलेल्या असला पाहिजेत.

क) महिलांच्या मालकीच्या हॉटेल / रेस्टॉरंट्समध्ये ५०% व्यवस्थापकीय व इतर कर्मचारी महिला असणे आवश्यक राहील.

ड) महिलांच्या मालकीच्या टूर आणि ट्रॅव्हल्स एजन्सी मध्ये ५०% कर्मचारी महिला असणे आवश्यक राहील.

इ) पर्यटन व्यवसायाकरीता आवश्यक सर्व परवानग्या प्राप्त असाव्यात.

ई) कर्जाचे हप्ते वेळेत भरले पाहिजेत.

२. पर्यटन संचालनालयाकडे नोंदणीकृत पर्यटन व्यवसायामध्ये कार्यरत असलेल्या महिला सहल मार्गदर्शक, महिला वाहन चालक, महिला सहल संचालक (टूर ऑपरेटर) व इतर महिला कर्मचारी यांना केंद्र / राज्य शासनाच्या विमा योजनेमध्ये सहभागी करुन त्यांचा वार्षिक विमा हप्ता पहिली ०५ वर्षे शासनामार्फत भरण्यात येईल.

**ब) <u>महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत प्रोत्साहने व सवलती</u> :-**

१. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाचे औरंगाबाद येथील पर्यटक निवास, राज्यातील प्रथम पूर्णत: महिला संचालित पर्यटक निवास म्हणून व खारघर रेसिडेन्सीचे “अर्का रेस्टॉरंट” पूर्णत: महिला संचालित रेस्टॉरंट म्हणून चालविण्यात येईल.

२. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाच्या टूर ऑपरेटरमार्फत आयोजित पर्यटन सर्किट / पॅकेजेस मध्ये महिला पर्यटकांना २०% सूट देण्यात येईल. या २०% सवलतीची रक्कम महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाद्वारे टूर ऑपरेटरला दिली जाईल. याकरीता होणाऱ्या खर्चाची प्रतिपुर्ती महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास शासनाकडून करण्यात येईल.

३. सर्व महिला पर्यटकांना, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाच्या सर्व रिसॉर्टस/युनिट्स मध्ये आंतरराष्ट्रीय महिला दिनानिमित्त ०१ ते ०८ मार्च या कालावधीत तसेच, वर्षभरात इतर २२ दिवस अशाप्रकारे एकूण ३० दिवस, फक्त ऑनलाईन बुकींगमध्ये ५०% सूट देण्यात येईल.

४. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाच्या मालमत्तांच्या ठिकाणी, महिला बचत गटांना हस्तकला, कलाकृती, प्रक्रिया केलेले खाद्यपदार्थ इत्यादींच्या विक्रीसाठी स्टॉल / जागा उपलब्ध करुन देण्यात येईल.

५. महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाच्या रिसॉर्टस मध्ये महिला पर्यटकांसाठी विशेष सुविधा:-

- अपंग किंवा वृध्द महिलांकरीता लिफ्ट जवळच्या खोल्या उपलब्ध करुन देण्यास प्राधान्य.
- महिलांसाठी विशेष खेळ, मनोरंजन कार्यक्रमांचे आयोजन.
- ५ वर्षांपर्यंतची मुले असलेल्या महिला पर्यटकांसाठी पाळणाघर.

६. महिला पर्यटकांच्या विविध गटांसाठी अनुभवात्मक टूर पॅकेजेस :-

- ज्येष्ठ महिला नागरिकांसाठी सहल.
- दिव्यांग महिलांसाठी विशेष सहल (शारीरिक आणि मानसिक अपंग दोन्ही).
- महिला पर्यटकांसाठी एक दिवसीय सहल आणि शहर सहली.
- महिलांसाठी साहसी सहली आणि ट्रेकींग टूर्सचे आयोजन.

५. महिला केंद्रित पर्यटन धोरणाच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता पर्यटन संचालनालयामध्ये महिला पर्यटन धोरण कक्ष स्थापन करण्यात येईल. या कक्षाकरीता बाह्यस्त्रोत यंत्रणेच्या माध्यमातून ०६ प्रकल्प अधिकारी व ०६ डाटा एंट्री ऑपरेटर इतके मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्यास व त्यावरील खर्चासाठी योजनेवर होणाऱ्या खर्चाच्या ०४% निधी वापरण्यात येईल.

६. महिलांना पर्यटन क्षेत्रामध्ये व्यवसाय व रोजगाराच्या संधी उपलब्ध व्हाव्यात, यासाठी तयार करण्यात आलेल्या "आई" या महिला केंद्रित / लिंग समावेशक पर्यटन धोरण राबविण्यासाठी वार्षिक कृती आराखडा निश्चित करुन त्याकरीता स्वतंत्र लेखाशिर्ष निर्माण करुन विभागाकडे उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतूदीमधून पुनर्विनियोजनाव्दारे आवश्यक वित्तीय तरतूद करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६१९१६४४०१३३२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

RADHIKA RASTOGI

Digitally signed by RADHIKA RASTOGI
DN: c=IN, o=Personal, pseudonym=3FEEF7CAAEF7F29228C1D884F1C3A5A76D778FED, 2.5.4.20=d651a79a6337b2eb26e07c965a1cc65b42c0f01cfa14bbe5c5772a587e510bbb, postalCode=400035, st=Maharashtra, serialNumber=29D171738552C85A1184A9DC20EDBE68EA10CCCE981E03D208EFA117377125E9, cn=RADHIKA RASTOGI
Date: 2023.06.20 14:50:25 +05'30'

**( राधिका रस्तोगी )**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. मंत्री(पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता विधानसभा, विधानभवन, मुंबई.
८. मा. सर्व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
९. मा. सर्व विधानसभा सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
१०. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
१४. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
१५. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर

१६. सर्व विभागीय आयुक्त
१७. सर्व जिल्हाधिकारी
१८.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१९. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
२०. सर्व मंत्रालयीन विभाग
२१. निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

****